जैसा प्रकटिलया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती । तरी तेतुलेही काय चालिजती । सांगें मज ।६१। कां उदकमय सकळ । जऱ्ही जाहलें असे महीतळ । तरी आपण घेपे केवळ । आर्तीचजोगें ।६२। तैसे ज्ञानीये जे होती । ते वेदार्थातें विवरिती । मग अपेक्षित तें स्वीकारिती। शाश्वत जें ।६३।

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेचु कदाचन । मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥४७॥**

म्हणौनि आइकें पार्था । याचिपरी पहतां । तुज उचित होय आतां । स्वकर्म हें ।६४। आम्हीं समस्तही विचारिलें । तंव ऐसेंचि हें मना आलें । जे न संडिजे तुवां आपुलें । विहित कर्म ।६५। परी कर्मफळीं आस न करावी । आणि कुकर्मीं संगति न व्हावी। हे सत्क्रियाचि आचरावी । हेतूविण ।६६।

**योगस्थ: कुरु कर्माणि संङ्गत्यक्त्वा धनंजय । सिद्ध्यसिद्ध्यो:समोभूत्वा समत्वं योग उच्यते ॥४८॥**

तूं योगयुक्त होउनी । फळाचा संग सांडुनी । मग अर्जुना चित्त देउनी । करीं कर्में ।६७। परी आदरिलें कर्म दैवें । जरी समाप्तीतें पावे । तरी विशेषें तेथ तोषावें । हेंही नको ।६८। कां निमित्तें कोणें ऐकें । तें सिद्धी न वचत ठाके । तरी तेथिंचेनि अपरितोखें । क्षोभावें ना ।६९। आचरतां सिद्धी गेलें । तरी काजाचि कीर आलें । परि ठेलियाही सगुण जहालें । ऐसेंचि मानीं ।२७०। देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरुषीं जरी अर्पिजे । तरी परीपूर्ण सहजें। जहालें जाणें ।७१। देखें सतासतीं कर्मीं । हें जें सरिसेपण मनोधर्मीं । तेचि योगस्थिति उत्तमीं । प्रशंसिजे ।७२।

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणा: फलहेतव: ॥४९॥**
**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते । तस्माद्योगाय युज्यस्व योग:कर्मसु कौशलम् ॥५०॥**

अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें । जेथ मना आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ।७३। तो बुद्धियोग विवरितां । बहुतें पाडें पार्था । दिसे हा अरुता । कर्मभागु ।७४। परी तेंचि कर्म आचरिजे । तरीच हा योगु पाविजे । जें कर्मशेष सहजे । योगस्थिति ।७५। म्हणोनि बुद्धियोगु सधरु । तेथ अर्जुना होईं स्थिरु । मनें करीं अव्हेरु । फळहेतूचा ।७६। जे बुद्धियोगा योजिले । तेचि पारंगत जाहले । इहीं उभयबंधीं सांडिले । पापपुण्यीं ।७७।

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिण: । जन्मबन्धविनिर्मुक्ता: पदं गच्छन्त्यनामयम् ॥५१॥**

ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती । आणि यातायाती लोपती । अर्जुना तयां ।७८। मग निरामयभरित । पावती पद अच्युत । ते बुद्धियोगयुक्त । धनुर्धरा ।७९।

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति । तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२॥**

तूं ऐसा तैं होसी । जैं मोहातें या सांडिसी । आणि वैराग्य मानसीं । संचरेल ।२८०। मग निष्कळंक गहन । उपजेल आत्मज्ञान। तेणें निचाडें होईल मन। आपैसें तुझें।८१। तेथ आणिक कांहीं जाणावें। कां मागिलातें स्मरावें। हें अर्जुना आघवें। पारुषेल।८२।

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला । समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥५३॥**

इंद्रियांचिया संगती । जिये पसरु होतसे मती । ते स्थिर होईल मागुती । आत्मस्वरूपीं ।८३। समाधिसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ । तैं पावसी तूं सकळ । योगस्थिति ।८४।

---

अर्थ: (४७) कर्मकांडाचो भाग. (४८) पुराय, संपूर्ण.

जशी जाता फांतोड । भोव मार्ग दिसतात । त्या सगल्यांनी कोण वचत । सांग म्हाका;।६१। वा उदकान भल्ली । जरी पृथ्वी सगली । तरी तान आपली । सरल्यार पुरो; ।६२। तशे जे ज्ञानी आसतात। नि वेदार्थ विसकायतात । मगे तांतले घेतात । शास्वत जें ।६३।

**कर्माचेर अधिकार तूजो केन्नाच ना फळांत तो । नाका कर्म फळा हेतू अकर्मा ओड बी तशी ।।४७।।**

**निश्काम कर्म करचें:** म्हणून आयक गा पार्था । हेच दिश्टीन पळयतां । तुका उचीत आतां । स्वकर्म ।६४। हांवें विचारांत घेवन सगलें । तेन्ना हेंच मर्नी आयलें । तुवें सोडचें न्ही आपलें । कर्तव्यकर्म ।६५। पूण कर्मफळीं आस न्ही धरची । नि कुकर्मा टाळचीं । सत्कर्मांच आचरचीं। फळा आस सोडून ।६६।

**फळाची आस सोडूनु योगानु कर्म तूं कर । सम येस अपेसांतु समबुद्दीच योग गा ।।४८।।**

**योगस्थिती:** तूं योग सम आपणावनु । फळाची आस सोडूनु । मगे अर्जुना मन लावनु । कर कर्मा ।६७। पूण आरंभिल्लें कर्म जरी । तडी पावलें सुदैवान तरी । ताचो संतोश अंतरीं । मानचो न्हय ।६८। वा कसल्याय एका कारणान । तें जालेंना पूर्ण । तरी त्या संतापान । नाका चडफडूं ।६९। आरंभिल्लें सिद्धी गेलें। तरी म्हणचें बरेंच जालें । अर्दकुटेंय जरी उल्लें । मानचें जालें सुफळ ।२७०। पळय, जितलें कर्म करचें । तितलेंय आदी पुर्सा ओंपचें । तेंच पूर्ण मानचें। सहजपणान ।७१। पूर्ण अपूर्ण कर्माठांयीं । हें जें सारकेंपण हृदयीं । तीच योगस्थिती म्हण्टी। गिन्यानी।७२।

**बुद्दीचे संतुळेकूयु कर्म भोवु उणाक गा । शरण वच बुद्दीकु दुर्भागी फळ इत्सुपी ।।४९।।**
**समबुद्दीन सोडी गा शाणो पातकु पुण्य बी । देखून योग तूं साध योग कर्मकुशळायु गा ।।५०।।**

अर्जुना, समतोल चित्ताचो । तोच जाण सार योगाचो । जंय मना नि बुद्दीचो । आसता एकचार ।७३। तो बुद्दीयोग विसकायतां । भोव तरांनी पार्था। खूब उणो दिसता । हो कर्मभाग[४७] ।७४। पूण तेंच कर्म आचरीत । तरूच हो बुद्दीयोग सादत। फळा भाग गाळीत । तीच सभावीक योगस्थिती ।७५। म्हणून बुद्दीयोगीं आधार । थंयच अर्जुना जा थीर । मनान नाका विचार । फळ हेतूचो ।७६। जे बुद्दीयोगान चलले । तेच संसारा पार पावले । दोनी पासांतल्यान सुटले । पाप-पुण्याच्या ।७७।

**गिन्यानी योग बुद्दीनु कर्माचें फळु सोडुनू । तोडूनु पास जल्माचे दुःखापेल्या पदा वती ।।५१।।**

ते कर्मांत जरी वर्ततात । पूण कर्मफळा आफुडनात । म्हूण फेरे तांचे सोंपतात । जल्ममर्णाचे ।७८। मगे ते बुद्दीयोगयुक्त । ब्रह्मानंदान पूर्ण । अशें मेळयतात शाश्वत स्थान । धनुर्धरा ।७९।

**जेन्ना बुद्दी तुजी पार्था मोहा गदळ तर्तली । आयकल्ल्या आयकुचेल्या भोगांकु विट्टलोच तूं ।।५२।।**

जंव तूं मोह सोडशी । नि मर्नी वैराग्य धरशी । तूंय असोच जाशी । अर्जुना तेन्ना ।२८०। मगे निश्कळंक गहन । मेळटलें आत्मज्ञान । तेन्ना निरीच्छ जातलें मन । आपशीं तुजें ।८१। थंय आनीक कितें जाणचें । वा फाटले अणभव स्मरचे । तें अर्जुना सगलें । सोंपतलें पूर्ण ।८२।

**वेदांनी गदळिल्ली जी बुद्दी जेन्ना थिरावतली । जावन चित्तांतु ती थीर तेन्ना तूं योग सादशी ।।५३।।**

इंद्रियांचे संगतीं । जी चंचळ जाता मती । ती थिरावतली परती । आत्मस्वरुपीं ।८३। समाधी सुखीं केवळ । जी बुद्दी जातली निश्चळ । तेन्नाच मेळत तुका सकळ[४८] । योगस्थिती ।८४।

*अर्जुन उवाच:* **स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव । स्थितधी:किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥५४॥**

तेथ अर्जुन म्हणे देवा । हाचि अभिप्रावो आघवा । मी पुसेन आतां सांगावा । कृपानिधी ।८५। मग अच्युत म्हणे सुखें । जें किरीटी तुज निकें । तें पूस पां उन्मेखें । मनाचेनि ।८६। या बोला पार्थे । म्हणितलें सांग पां श्रीकृष्णातें । काय म्हणिपे स्थितप्रज्ञातें । वोळखों केवीं ।८७। आणि स्थिरबुद्धि जो म्हणिजे । तो कैसां चिन्हीं जाणिजे । जो समाधिसुख भुंजे । अखंडित ।८८॥ तो कवणे स्थिती असे । कैसेनि रूपीं विलसे । देवा सांगावें हें ऐसें । लक्ष्मीपती ।८९। तंव परब्रह्मअवतरणु। जो षड्गुणाधिकरणु । तो काय तेथ नारायणु । बोलतु असे ।**२९०**।

*श्रीभगवानुवाच:* **प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् । आत्मन्येवात्मना तुष्ट: स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥५५॥**

म्हणे अर्जुना परियेसीं । जो हा अभिलाषु प्रौढ मानसीं । तो अंतराय स्वसुखेंसी । करीत असे ।९१। जो सर्वदा नित्यतृप्तु । अंत:करणभरितु । परी विषयामाजी पतितु । जेणें संगें कीजे ।९२। तो कामु सर्वथा जाये । जयाचें आत्मतोषीं मन राहे । तोचि स्थितप्रज्ञु होये । पुरुष जाणें ।९३।

**दु:खेष्वनुद्विग्नमना: सुखेषु विगतस्पृह: । वीतरागभयक्रोध: स्थितधीर्मुनिरुच्यते ॥५६॥**

नाना दु:खीं प्राप्तीं । जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया आर्ती । अडपैचिजेना ।९४। अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोधु सहजें नाहीं । आणि भयातें नेणे कहीं । परिपूर्ण तो ।९५। ऐसा जो निरवधि । तो जाण पां स्थिरबुद्धि । जो निरसूनि उपाधिं । भेदरहितु ।९६।

**य: सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५७॥**

जो सर्वत्र सदा सरिसा । परिपूर्ण चंद्रु कां जैसा । अधमोत्तम प्रकाशा-। माजीं न म्हणे ।९७। ऐसी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सदयता । आणि पालटु नाहीं चित्ता । कवणे वेळे ।९८। गोमटें कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभवे । जो ओखटेनि नागवे । विषादासी ।९९। ऐसा हरिखशोकरहितु। जो आत्मबोधभरितु । तो जाण पां प्रज्ञायुक्तु । धनुर्धरा ।**३००**।

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वश: । इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५८॥**

कां कूर्म जियापरी । उवाइला अवेव पसरी । ना इच्छावशें आवरी । आपुले आपण ।१। तैसीं इंद्रियें आपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पातली असे ।२।

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिन: । रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥५९॥**

आतां अर्जुना आणिकही एक । सांगेन ऐकें कवतिक । या विषयांतें साधक । त्यजिती नियमें ।३। श्रोत्रादि इंद्रियें आवरिती । परि रसने नियमु न करिती। ते सहस्त्रधा कवळिजती । विषयीं इहीं ।४। जैसी वरिवरी पालवी खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे । तरी कैसेनि नाशु निपजे । तया वृक्षा ।५। तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा आडवेनि आंगें फांके । तैसा मानसीं विषो पोखे । रसनाद्वारें ।६। येरां इंद्रियां विषय तुटे । तैसा नियमूं न ये रस हटें । जे जीवित हें न घटे । येणेंविण ।७। मग अर्जुना स्वभावें । ऐसियाही नियमातें पावे । जैं परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ।८। तैं शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती । जैं सोहंभावप्रतीती । प्रगट होय ।९।

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चित: । इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मन: ॥६०॥**

ये‍र्‍हवीं तरी अर्जुना । हें आया नये साधना । जे राहटताती जतना । निरंतर ।**३१०**। जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी । जे मनातें सदा मुठी । जे मनातें सदा मुठी । धरुनि आहाती ।११।

---

अर्थ: (४९) खर इत्सा. (५०) तिडक.

*अर्जुनान म्हळें :* **थीरबुद्दी मनशाचें गा लक्षण केशवा कितें । थीर आल्यांतु तो जाल्लो, बसऽ चलऽ उलै कसो ॥५४॥**

**थीरबुद्दी मनशाचें (स्थितप्रज्ञाचें) लक्षण:** तंव म्हळें अर्जुनानु । होच विशय सगलो विचारिनु । सांग म्हाका कृपा कर्नु । कृपेभांडार देवा ।८५। मगे कृष्ण संतोशान म्हण्टा। विचार तूं, जें बरें दिसता । मेकळ्या मनान आतां । गा अर्जुना ।८६। ही जाप आयकूनु । श्रीकृष्णा म्हणी अर्जुनु । देवा, थीरबुद्दी तो कोणु । ताका वळखुंचो कसो? ।८७। आनी थीरबुद्दी जो म्हण्टी। तो जाणचो खंयच्या लक्षणांनी?। जो भोगी समाधी । अखंडीत ।८८। तो खंयचे स्थितींत आसता?। प्रपंचीं कसो रावता? । देवा हें सांगचें आतां । सगलें म्हाका ।८९। तंव परब्रह्म श्रीकृष्ण । जाका स गुणांचें अधिश्टान । थंय कितें तो नारायण । आयक, उलयलो तें ।२९०।

*भगवंतान म्हळें :* **इत्सा मनांतुल्यो सर्व जेन्ना सामक्योच सोडुनू । धादोस अंतरीं जाल्लो तो म्हळा थीर बुद्दिचो ॥५५॥**

आयक, म्हणी अर्जुन । जी इत्सा बळीश्ट मनांत । तीच येता आड । आत्मसुखाच्या ।९१। जो सदांकाळ तृप्त । मन जाचें ज्ञानयुक्त । तोय पडटा विशयांत । तिका लागून ।९२। ती इत्सा सामकी सरता । जाचें मन आत्मसंतुश्ट रावता । तोच मनीस थीरबुद्दी आसता । जाण तूं ।९३।

**उबगना मन दु:खांतु सुखाची आस ना असो । भंय क्रोध प्रिती गेल्लो थीरबुद्दी मुनी म्हळा ॥५६॥**

दु:खां तरांतरांचीं येतां । जाका चित्तीं उद्वेग नासता । तशी सुखाचियु आस ताका । घुसपायना ।९४। अर्जुना ताच्या अंतस्कर्णांत । सहज सल्ला काम[४९] क्रोध[५०]। भंयाचो ना गंध । परिपूर्ण जाल्ल्यान ।९५। जो अशे तरेनु । संवसार उपाधी सोडूनु । जाला भेदहीनु । तो जाण थीरबुद्दी ।९६।

**ओड कसलीच ना जाका वायट बऱ्यांतु बी तशी । ना ताका खोस दुस्वासु ताची प्रज्ञा थिरावली ॥५७॥**

जो सदीं सगल्यां सारको । पुनवेचो चंद्रीम जसो । करना भेद उणाक उंच असो । उजवाड दितना ।९७। अशी अखंड समता। दयाळ जो प्राणीमात्रां। पालट जायना चित्ता । खंयच्याय वेळार ।९८। कितेंय बरें जायत । जायना तो तुश्ट । कितेंय वायट घडत । चित्ता ना खेद ।९९। असो जो हर्शखेदाविरयत । गुल्ल आत्मस्वरुपांत । तोच जाणचो प्रज्ञाभरीत । धनुर्धरा ।३००।

**ओडी भितूर आपणालीं विशयांतसून इंद्रियां । कांसवावरि सर्वांगां ताची प्रज्ञा थिरावली ॥५८॥**

वा कांसव जे परी । आंखुडिल्ले अवेव पसरी । वा आपले इत्सेनूच आवरी । आपले आपूण ।१। तशीं इंद्रियां स्वाधीन जातात। जाचे म्हणिल्लें करतात । ताची बुद्दी थीर जाण । गा पार्था ।२।

**विशयूच सरती फाटीं । तांकां गा भोगिनातु जे । विशयांची सरना रूच । वता ती ब्रह्मदर्शनान ॥५९॥**

**जिबेचो संयम:** आतां अर्जुना, आनिकूय एक। नवल सांगन, आयक । जे साधक विशयांक। सोडटात नेमान ।३। कानादी इंद्रियां आवरतात। पूण जीब रावना ताब्यांत। हजार तरांनी कवळटात। विशय तांकां ।४। जशी पालय खुडीत वयले वयर। नि उदक शिंपीत मुळांर। सुकून मरत कसो तर । रुख तो?।५। तो उदकान अदीक लसलसता। आडव्या आंगान फोफावता। तशे विशय मनीं पोसवता। जिबे वरवीं ।६। हेर इंद्रियांचे विशय तुटत । पूण जिबेच्या हटान ना सुटत । पोसवचेंना जिवीत। तांचेवीण ।७। मगे सहज गा, धनुर्धर । सादऽ विजय जिबेर। जंव परब्रह्म साक्षात्कार । अणभवता तो ।८। तंव देहभाव सरता। इंद्रियां विशय विसरता। जंव 'हांव ब्रह्म' अणभवता। साधक।९।

**कितलोयु यत्न केल्यारू ज्ञानवंतानु अर्जुना । व्हरी मनाकु ओडूनू बळयांच मस्त इंद्रियां ॥६०॥**

**इंद्रियांचें बळ:** हरशीं तरी अर्जुना । जे निरंतर करी साधना । इंद्रियां आळाबंदा येना । केन्ना तांच्या ।३१०। घालून गस्त अभ्यासाची । बांदून कवडां यमनेमांचीं । जे मन सदां मुठींतुची । धरून आसतात; ।११।

तेही किजती कासाविसी । या इंद्रियांची प्रौढी ऐसी। जैसी मंत्रज्ञातें विवसी । भुलवी कां ।१२। देखें विषय हे तैसे । पावती ऋद्धिसिद्धीचेनि मिषें । मग आकळिती स्पर्शें । इंद्रियांचेनी ।१३। तिये संधीं मन जाये । मग अभ्यासीं थोटावलें ठाये । ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें ।१४।

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः । वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६१॥**

म्हणोनि आइकें पार्था । यांतें निर्दळी जो सर्वथा । सर्व विषयीं आस्था । सांडूनियां ।१५। तोचि तूं जाण । योगनिष्ठेसि कारण। जयाचें विषयसुखें अंतःकरण । झकवेना ।१६। जो आत्मबोधयुक्तु । होऊनि असे सततु । जो मातें हृदयाआंतु । विसंबेना ।१७। एऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं । परी मानसीं होईल जरी कांहीं । तरी साद्यंतचि हा पाहीं । संसारु असे ।१८। जैसा कां विषाचा लेशु । घेतलियां होय बहुवसु । मग निभ्रांत करी नाशु । जीवितासि ।१९। तैसी या विषयांची शंका । मनीं वसती देखा। धातु करी अशेखा । विवेकजाता ।**३२०**।

**ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते । सङ्गात्संजायते कामःकामात्क्रोधोऽभिजायते ॥६२॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥६३॥**

जरी हृदयीं विषय स्मरती । तरी निसंगाही आपजे संगती । संगीं प्रगटे मूर्ति । अभिलाषाची ।२१। जेथ कामु उपजला । तेथ क्रोधु आधींचि आला । क्रोधीं असे ठेविला । संमोह जाणें ।२२। संमोहा जालिया व्यक्ति । तरी नाशु पावे स्मृति । चंडवातें ज्योति । आहत जैसी ।२३। कां अस्तमानीं निशी। जैसी सूर्यतेजातें ग्रासी । तैसी दशा स्मृतिभ्रंशीं । प्राणियांसी ।२४। मग अज्ञानांध केवळ । तेणें आप्लविजे सकळ । तेथ बुद्धि होय व्याकुळ । हृदयामाजीं ।२५। जैसें जात्यंधा पळणी पावे । ते काकुळती सैरा धांवे । तैसे बुद्धिसि होती भवें । धनुर्धरा ।२६। ऐसा स्मृतिभ्रंशु घडे । मग सर्वथा बुद्धि अवघडे । तेथ समूळ हें उपडे । ज्ञानजात ।२७। चैतन्याचां भ्रंशीं । शरीरा दशा जैशी। तैशी पुरुषा बुद्धिनाशीं । होय देखें ।२८। म्हणोनि आइकें अर्जुना । जैसा विस्फुलिंग लागे इंधना । मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना । पुरों शके ।२९। तैसें विषयांचें ध्यान । जरी विपायें वाहे मन । तरी येसणें हें पतन । गिंवसीत पावे ।**३३०**।

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् । आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥६४॥**

म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे । मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ।३१। पार्था आणिकही एक । जरी नाशले रागद्वेष । तरी इंद्रियां विषयीं बाधक । रमतां नाहीं ।३२। जैसा सूर्य आकाशगतु । रश्मिकरीं जगातें स्पर्शतु । तरी संगदोषें काय लिंपतु । तेथिंचेनि ।३३। तैसा इंद्रियार्थी उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न । जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ।३४। तरी विषयांतुही कांहीं । आपणपेंवाचुनि नाहीं । मग विषय कवण कायी। बाधितील कवणा ।३५। जरी उदकें उदकीं बुडिजे । कां अग्नि आगी पोळिजे । तरी विषयसंगें आप्लविजे । परिपूर्ण तो ।३६। ऐसा आपणचि केवळ। होऊनि असे निखळ । तयाची प्रज्ञा अचळ । निभ्रांत मानीं ।३७।

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते । प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥६५॥**

देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता । तेथ रिगणें नाहीं समस्तां । संसारदुःखां ।३८। जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु । तया क्षुधेतृषेचा अडदरु । कहींचि नाहीं ।३९। तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें कें आहे । तेथ आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ।**३४०**। जैसा निर्वातीचा दीपु । सर्वथा नेणे कंपु । तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु । योगयुक्तु ।४१।

---

अर्थः (५१) पोटांत.

तांकांय करी व्याकूळ । अशें ह्या इंद्रियां बळ । जशी मांत्रिकां हडळ । घाली भुरळ ।१२। तशे पळय, हे विशय भुलयतात । रिद्धीसिद्धी रुपान येतात । मगे साधकां घेरतात । इंद्रियां वरवीं ।१३। त्या पेंचांत मन शिरकलें । मगे अभ्याशीं थोटें जालें । अशें बळ इतलें । इंद्रियांचें ।१४।

**तांकां आवरूनु युक्तीनु थाराय मन म्हज्यांतु गा । इंद्रियां वश जाल्ल्याची पार्था बुद्दी थिरावली ॥६१॥**

म्हणून आयक पार्था । जो इंद्रियां पुराय निर्दाळता । सगल्या विशयांची आस्था । सोडून;।१५। जाचें अंतस्करण । वचना विशयसुखा भुलून । ताकाच योगनिशठे अधिकारपण । फावता गा ।१६। म्हाका एकल्याकूच अंतरांत । विसरना खीण लेगीत। जो आत्मबोधभरीत । तोच थीरबुद्दी जाण ।१७। हरशीं भायले विशय सोडले । पूण मनीं सदां घोळयले । तर जाणचें ना सुटलें। संवसार बंधन ।१८। घेत इल्लें जरी वीख । चडटा तें सगले कुडीक । मगे निश्चीत जिवाक । नाशी तें;।१९। तशी विशयां इत्सा अंतरीं । इल्लीशी रावली जरी । घातु ती पुराय करी । सगल्या विवेकाचो।३२०।

**विशय येवजुपी मन्शाक ओड तांचीच लागता । ओडीनु जल्मता इत्सा इत्सेन तिडकु अर्जुना ॥६२॥**
**गदळटा बुद्दी तिडकीन वता तिणेंच सुद्द गा । गेल्ल्यान सुद्द वता बुद्द जाता घात तिणेंच गा ॥६३॥**

**विशयध्यानाचो परिणाम:** अंतरीं विशयांची जाता स्मृती । विरक्ताकय जाता आसक्ती । विशयसंगान परगट्टा मुर्ती । विशय वासनेची ।२१। जंय विशयां इत्सा जाली । थंय तिडक आर्दीच आयली । तिडकीसवें आयली । मती अविचारी ।२२। अविचार परगट्टां। मनशां सुद्द वता । वाऱ्यान वाडवता । दिव्या जोत जशी ।२३। वा अस्ता वेळारी रात जशी । सुर्या तेजाक ग्राशी । सुद्द गेल्ल्या मनशा तशी । वता दशा ।२४। मगे अज्ञानान आंधळो केवळु । तातूंत बुडटा सकळु । थंय बुद्दी जाता व्याकुळु । अंतरीं ।२५। जशें जल्मांधा धांवचें संकट । तो बाबडो धांवता सैराट । तशी धुंवळीन बुद्द । लागऽ ती हेडूंक ।२६। असो स्मृतीभ्रंश जातां । बुद्दी सामकीच गदळटा । मगे सगलें ज्ञान सरता । मुळासयत ।२७। अर्जुना जीव वतां । जशी देहा दशा जाता । तशी बुद्दी नाशान जाता । मनशा दशा ।२८। म्हूण अर्जुना आयक । उज्या कीट लागता जळोवाक । तीच भडकून त्रिभुवनाक । उडय लासून ।२९। तशें विशयांचें ध्यान । केलें घडये आपशीं मनान । तरी इतलें हें पतन । सोदीत येता ताका ।३३०।

**आसक्ती द्वेश सोडूनु जिखून सर्व इंद्रियां । वावरून विशयांतू तो जोडी मना प्रसन्नताय् ॥६४॥**

**आत्मनिश्ट होच थीरबुद्दी:** म्हूण हे विशय सगले । सामके काडचे मनांतले । मगे वासना द्वेश हे वतले । आपशीं ।३१। पार्था आनिकूय एक । सरतां वासना द्वेश । जरी रमलीं इंद्रियां विशयांत । बाधनात तीं ।३२। जसो सूर्य आकाशांतल्यानु। स्पर्शिता जगा किर्णाहातानु । पूण जगाच्या संसर्गदोशान । म्हेळना तो;।३३। तसोच इंद्रियांविशयां ठांय अलिप्त । गुल्ल आत्मआनंदांत। नि इत्सा तिडकी विरयत । रावता जो; ।३४। आनी विशयांतुयु । पळेना आत्मरुपाशिवाय कांयु । मगे रावत कसले विशयु। ते बादतले कोणा?।३५। जर उदकांत उदक बुडत । उजो उज्या लाशीत । तरूच विशयसंगान बुडत । तो पूर्ण पुरूश ।३६। असो आपुणूच केवळु । जावन रावऽ निखळु । ताची प्रज्ञा अचलु । मान दुभावावीण ।३७।

**समाधानानु गा पार्था सर्व दुख्खां वती लया । प्रसन्नचित्त जी बुद्द बेगिनूच थिरावता ॥६५॥**

**बुद्दीची प्रसन्नताय:** पळय, अखंड प्रसन्नता । आसता जाच्या चित्ता । थंय रिगाव केन्ना नासता । संवसार दुःखा ।३८। जशी अमृताची झरी। लागली जाचे उदरीं[११]। ताका भिरांत ताने भुकेची । आफडिना केन्ना ।३९। तशें हृदय जाता प्रसन्नु । थंय दुःख खंयचें, खंयसूनु?। बुद्दी जाता आपशीं लीनु । परमात्म्या स्वरुपीं ।३४०। जसो आडोसांत दीपु । नेणा मातूय कांपु । तसो थीरबुद्दी स्वस्वरुपु । योगभरीत ।४१।

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना । न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतःसुखम् ॥६६॥**

ये युक्तीचि कडसणी । नाहीं जयाचां अंतःकरणीं । तो आकळिला जाण गुणीं । विषयादिकीं ।४२। तया स्थिरबुद्धि पार्था । कहीं नाहीं सर्वथा । आणि स्थैर्याची आस्था । तेही नुपजे ।४३। निश्चळत्वाची भावना । जरी नव्हेचि देखें मना । तरी शांति केवीं अर्जुना । आपु होय ।४४। आणि जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं । तेथ सुख विसरोनि न रिगे कांहीं । जैसा पापियांचा ठायीं। मोक्षु न वसे ।४५। देखें अग्निमाजीं घापती । तिये बीजें जरी विरूढती । तरी अशांता सुखप्राप्ती । घडों शके ।४६। म्हणोनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें । या कारणें इंद्रियांचें । दमन कीजे ।४७।

**इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते । तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥६७॥**

इंद्रियें जें जें म्हणती । तें तेंचि जे पुरुष करिती । ते तरलेचि न तरती । विषयसिंधु ।४८। जैसी नाव थडिये ठाकितां । जरी वरपडी होय दुर्वाता । तरी चुकलाही मागौता । अपावो पावे ।४९। तैसीं प्राप्तेंही पुरुषें । इंद्रियें लाळिलीं जरी कौतुकें । तरी आक्रमिला देख दुःखें । सांसारिकें ।**३५०**।

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः । इंद्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६८॥**

म्हणोनि आपुलीं आपणपेया। जरी यें इंद्रियें येती आया। तरी अधिक कांहीं धनंज़या । सार्थक असे ।५१। देखें कूर्म जियापरी। उवाइला अवयव पसरी। ना तरी इच्छावशें आवरी। आपणपेंचि।५२। तैसीं इंद्रियें आपैतीं होती। जयाचें म्हणितलें करिती। तयाची प्रज्ञा जाण स्थिती। पातली असे।५३। आतां आणिक एक गहन। पूर्णाचें चिन्ह । अर्जुना तुज सांगेन । परिस पां।५४।

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी । यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥६९॥**

देखें भूतजात निदेलें । तेथेंचि जया पाहलें । आणि जीव जेथ चेइले । तेथ निद्रितु' जो ।५५। तोचि तो निरुपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि । तोचि जाणें निरवधि । मुनीश्वर ।५६।

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् । तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥७०॥**

पार्था आणीकही परी। तो जाणों येईल अवधारीं । जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ।५७। जरी सरिताओघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तरी अधिक नोहे ईषत् । मर्यादा न संडी ।५८। ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता। परी न्यून नव्हे पार्था । समुद्रु जैसा ।५९। तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धी । तयासि क्षोभु नाहीं बुद्धी । आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ।**३६०**। सांगें सूर्याचां घरीं । प्रकाशु काय वातीवेरी । कीं न लविजे तरी अंधारीं । कोंडेल तो ।६१। देखें ऋद्धिसिद्धि तयापरी । आलीगेली से न करी । तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ।६२। जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभवनातें पाबळें म्हणे। तो केवीं रंजे पालिवणें । भिल्लांचेनि ।६३। जो अमृतासि ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि।६४। पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं । तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता होती ।६५।

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः । निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥७१॥**

ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला । तोचि स्थिरप्रज्ञु भला । वोळख तूं ।६६। तो अहंकारातें दंडुनी । सकळ कामु सांडोनी । विचरे विश्व हेऊनि । विश्वाचि माजीं ।६७।

---

अर्थः (५२) संवसारसागर. (५३) ज्ञानाची फांतोड जाली. (५४) विशयसुखांत.

**नास्ता योगाविणें बुद्दी  उरना ध्यानभावना । ना भावनेविणें शांती  शांतीविणें कशें सुख ॥६६॥**

**शांतीपासत थीरबुद्दीः** ह्या बुद्दीयोगाची विचारसरणी । ना जाचे अंतस्कर्णी । तो घुसपलो पासांनी । विशयांच्या ।४२। ताका थीरबुद्दी पार्था । मातूय गा नासता । आनी थिरताये आस्ता । तियु उपजना ।४३। थिरतायेची भावना । जर नासली मना । तर शांती कशी अर्जुना । तो आपणायत? ।४४। आनी जंय शांतीचो जिवाळो ना । थंय सूख चुकुनूय रिगना । जसो पातक्या ठांय वसते येना। मोक्ष केन्नाच ।४५। पळय, उज्यांत घातिल्लीं । बियां जर किल्लर्ली । तरूच अशांता मेळटली । सूखशांती ।४६। म्हूण मनाचें अथीरपण । हेंच सर्व दुःखा कारण । देखून इंद्रियांचें दमन । करशी उत्तम ।४७।

**इंद्रियां धांवति सैराट  ताचे माक्शी वता मन । व्हरी तें बुद्दि ओडूनु  वारो जसो व्हडें जळीं ।६७।**

इंद्रियां जें जें म्हण्टी । तें तेंच जे मनीस करती । मानती तरले, तरी तरनाती । विशयसिंधु[५२]।४८। व्हडान तड गांठली । तेन्नाच मोडांत सांपडली । दुर्गती जी टळिल्ली । पर्थून आयली ।४९। तशें सिद्ध पुरुशान । इंद्रियां लाडकायलीं मजेन । तर तो संसारतापान । वता घेरून ।३५०।

**देखुनू इंद्रियां जाणें  विशयांतसूनु आपुल्या । आंवळून सम धरल्यांतु  ताची बुद्दी थिरावली ।६८।**

**इंद्रियां जिखपीच थीरबुद्दीः** म्हणून आपलेंच आपलीं । इंद्रियां स्वाधीन हाडलीं । तर अदीक कितें उल्ली। सार्थकताय?।५१। पळय कांसव जे परी। आपले अवेव पसरी । आनी स्वेच्छेन आवरी । आपुणूच; ।५२। जाचीं इंद्रियां आज्ञेंत रावलीं । ताचें म्हणिल्लें करती । ताची थीर जाली बुद्दी । समज तूं ।५३। आतां आनीक एक गहन । पूर्णपुरुशाचें लक्षण । अर्जुना तुका सांगन । आयक गा ।५४।

**रात जी सर्व जीवांची  तेन्ना जागोच संयमी । जागतातु विशयीं लोक  थीरबुद्दीकु रात ती ।६९।**

जंय प्राणीमात्र न्हिदिल्ले । थंय ताचें फालेलें[५३] । जंव जीव विशर्यीं[५४] जागिल्ले । थंय तो न्हिदिल्लो ।५५। उपाधी* विरयत तोच । अर्जुना, थीरबुद्दी तोच। आनी सर्वस्वी तोच । सत्पुरुश ।५६।

**भरुनूय उपाट सदींच थीर  तो समुद्र जसो अचळ शांत ।**
**इत्सा भोगुनूय जो सदींच थीर  ताकाच शांती न्ही भोग वान्शीकु ॥७०॥**

**रिद्धिसिद्धी विर्शी तुच्छताय (वा उवेखणी):** पार्था आनिकूय एक तरा। वळखुंचेली ह्या नरा। जशी शांतताय सागरा। अखंडीत;।५७। जरी न्हंयाचे ओघ। सागरा मेळटी भर्न उपाट। तरी तो वाडना मात। सोडिनाय मर्याद;।५८। वा त्यो न्हंयो गिमांत। वती आटून समस्त। तरी उणावना मात लेगीत। समुद्र जसो;।५९। तशेंच मेळटां रिद्धिसिद्धि। उचंबळना ताची बुद्दी। वा मेळ्ळ्योनाय त्यो सिद्धी। चळना धीरवृत्ती।३६०। सांग सुर्याच्या घरीं । उजवाड दिव्याचेरी? । वा तो लाभलो ना जरी, अंधारीं । कोंडटलो तो? ।६१। पळय रिद्धिसिद्धि ते परी। आयल्यो गेल्यो तांकां ना स्मरी। तो गुल्ल अंतरीं । आत्म्या महासुखीं।६२। आपली गिरेस्ताय चोवनु । जो कुसकुटाय इंद्रभुवनु। ताका कसलें समाधानु । भिल्लाचे खोंपीं ।६३। जो नांवां दवरी अमृताक । तो जसो लायना हात पेजेक । तशें जाणें अणभवलें आत्मसूख । भोगिना रिद्धि ।६४। पार्था पळय हें नवल । जंय सर्गसुखा ना मोल । थंय रिद्धी सिद्धीक कोण। विचारता गा ।६५।

**सगले विशय सोडूनु  म्हजें मीपण सांडुनू । लोभा विरेतु वावुर्ता  शांती ताकाच मेळऽ गा ॥७१॥**

असो तृप्त आत्मज्ञानान । पुश्ट परमानंदान । वळखुचो ताकाच खरेंपणान । थीरबुद्दी ।६६। जो मीपण पयसावन । सगल्यो इत्सा सोडून । विश्व जावन आपूण । वावुरता विश्वामदीं ।६७।

**ऐषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥७२॥**

हे ब्रह्मस्थिति निःसीम। जे अनुभविती निष्काम। ते पावले परब्रह्म। अनायासें।६८। जे चिद्रूपीं मिळतां। देहांतींची व्याकुळता। आड ठाकों न शके चित्ता। प्राज्ञा जया।६९। तेचि हे स्थिति। स्वमुखें श्रीपति। सांगत अर्जुनाप्रति। संजय म्हणे।**३७०**। ऐसें कृष्णवाक्य ऐकिलें। तेथ अर्जुनें मनीं म्हणितलें। आतां आमुचियाचि काजा आलें। उपपत्ती इया।७१। जें कर्मजात आघवें। एथ निराकारिलें देवें। तरी पारुषलें म्यां झुंजावें। म्हणूनियां।७२। ऐसा श्रीअच्युताचिया बोला। चित्तीं धनुर्धरु उवायिला। आतां प्रश्नु करील भला। आशंकोनियां।७३। तो प्रसंगु असे नागरु। जो सकळ धर्मासि आगरु। कीं विवेकामृतसागरु। प्रांतहीनु।७४। जो आपण सर्वज्ञनाथु। निरूपिता होईल श्रीअनंतु। ते ज्ञानदेवो सांगेल मातु। निवृत्तिदासु।**३७५**।

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
**सांख्ययोगो** नाम **द्वितीयोऽध्यायः** ॥२॥
(श्लोक ७२, ओव्या ३७५)

ॐ श्रीसच्चिदानन्दार्पणमस्तु ।



**पार्था हीच स्थिती ब्राह्मी  मेळटच मोह जायिना । अंतखिणारू भोगी जो  ब्रह्मानंदाक पावऽ गा ॥७२॥**

हीच निस्सीम ब्रह्मस्थिती । हिका जे अणभवती । ते निश्काम मनीस ब्रह्मपदीं । विलीन जाले अनायासान ।६८। चित्स्वरुपीं मेळटां । देहान्तीची व्याकुळता । त्या थीरबुद्दीच्या चित्ता । आफडिना ।६९। ''तीच ही स्थिती । स्वमुखान श्रीपती । अर्जुना सांगी''। म्हणी संजय ।**३७०**। अशें कृष्णवाक्य आयकलें । तंव अर्जुनान मनीं म्हळें ।आतां आपलें काम जालें । ह्या विस्तारान ।७१। सगल्या कर्मांचो निशेध । केलो सोताच देवान । आतां म्हजें झूज । थारतलें निशिद्ध ।७२। श्रीकृष्णाची ही जाप आयकूनु । मनीं हर्सलो अर्जुनु । फुडें करतलो प्रस्नु । जावनु दुभावीत ।७३। तो प्रसंग रोसाळ, सुंदर । जो सर्व धर्माचें भांडार । वा विवेकअमृतसागर । अनंत अपार ।७४। ताचें पुराय निरूपण । करतलो सर्वज्ञ श्रीकृष्ण । ताचेंच करतलो निवेदन। निवृत्तिदास ज्ञानदेव ।**३७५**।

हे भाशेन श्रीभगवंतान सांगिल्ल्या उपनिषदांतलो ब्रह्मविद्येंतलो योगशास्त्राचो
श्रीकृष्ण आनी अर्जुन हांच्या संवादांतलो
**सांख्ययोग** नांवाचो **दुसरो** अध्याय सोंपलो.
(गीता श्लोक ७२; होंवयो ३७५)

ही ज्ञानेश्वरी मराठीतुली । कोंकणी भाशेंत अनुसर्जिली ।
ज्ञानेश्वरदास सुरेशान सांगिली । माऊलीचेच आज्ञेनु ॥





# ।। ज्ञानेश्वरी ।।

## अध्याय तिसरा

*अर्जुन उवाच:* **ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन । तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥१॥**

मग आइका अर्जुनें म्हणितलें । देवा तुम्हीं जें वाक्य बोलिलें । तें निकें म्यां परिसलें । कमळापती ।१। तेथ कर्म आणि कर्ता। उरेचिना पाहतां । ऐसें मत तुझें अनंता। निश्चित जरी।२। तरी मातें केवीं हरी। म्हणसी पार्था संग्रामु करीं। इये लाजसी ना महाघोरीं। कर्मी सुतां।३। हां गा कर्म तूंचि अशेष। निराकरिसी नि:शेष। तरी मजकरवीं हें हिंसक। कां करविसी तूं।४। तरी हेंचि विचारीं हृषीकेशा। तूं मानु देसी कर्मलेशा। आणि येसणी हें हिंसा। करवीत आहासी।५।

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे। तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥२॥**

देवा तुवांचि ऐसें बोलावें। तरी आम्हीं नेणतीं काय करावें । आतां सरलें म्हणों पां आघवें। विवेकाचें।६। हां गा उपदेशु जरी ऐसा। तरी अपभ्रंशु तो कैसा। आतां पुरला आम्हां धिंवसा। आत्मबोधाचा।७। वैद्यु पथ्य वारूनि जाये। मग जरी आपणचि विष सुये। तरी रोगिया कैसेनि जिये। सांगें मज ।८। जैसें आंधळें सुईजे आव्हांटा । कां माजवण दीजे मर्कटा । तैसा उपदेशु हा गोमटा। वोढवला आम्हां ।९। मी आधींचि कांहीं नेणें। वरी कवळिलों मोहें येणें। कृष्णा विवेकु या कारणें। पुसिला तुज।**१०**। तंव तुझी एकेकी नवाई। एथ उपदेशामाजिं गांवाई। तरी अनुसरलिया काई। ऐसें कीजे।११। आम्हीं तनुमनुजीवें। तुझिया बोला वोटंगावें। आणि तुवांचि ऐसें करावें। तरी सरलें म्हणे।१२। आतां ऐसियापरी बोधिसी। तरी निकें आम्हां करिसी। एथ ज्ञानाची आस कायसी। अर्जुन म्हणे।१३। तरी ये जाणिवेचें कीर सरलें।परी आणीक एक असें जाहलें। जें थितें हें डहुळलें। मानस माझें।१४। तेवींचि कृष्णा हें तुझें। चरित्र कांहीं नेणिजे। जरी चित्त पाहसी माझें। येणें मिषें।१५। ना तरी झकवीतु आहासी मातें । कीं तत्त्वचि कथिलें ध्वनितें। हें अवगमितां निरुतें। जाणवेना।१६। म्हणोनि आइकें देवा। हा भावार्थु आतां न बोलावा। मज विवेकु सांगावा। मऱ्हाटा जी।१७। मी अत्यंत जड असें। परी ऐसाही निकें परियसें। कृष्णा बोलावें तुवां तैसें। एकनिष्ठ।१८। देखें रोगातें जिणावें। औषध तरी देयावें। परी तें अतिरुच्य व्हावें। मधुर जैसें।१९। तैसें सकळार्थभरित। तत्त्व तरी सांगावें उचित। परी बोधे माझें चित्त । जयापरी।**२०**। देवा तुजऐसा निजगुरु। आजि आर्तीधणी कां न करूं। एथ भीड कवणाची धरूं। तूं माय आमुची।२१। हां गा कामधेनूचें दुभतें। दैवें जाहलें जरी आपैतें। तरी कामनेची कां तेथें। वानी कीजे।२२। जरी चिंतामणी हातां चढे। तरी वांछेचें कवण सांकडें। कां आपुलेनि सुरवाडें। इच्छावें ना।२३। देखें अमृतसिंधुतें ठाकावें। मग ताहाना जरी फुटावें। तरी सायासु कां करावे। मागील ते।२४।

---

अर्थ: (१) कर्मापरस ज्ञान स्रेश्ठ हें तुजें मत. (२) श्रीकृष्णा. (३) अमृताच्या सागराचे देगेर. 	*** टिपो:** परिशिश्ट ४ पळयात.




# ।। ज्ञानेश्वरी ।।

## अध्याय तिसरो

*अर्जुनान म्हळें:* **बुद्दी कर्माकुयू थोरू  दिसऽ तुका जनार्दना । घाली कित्याकु तूं म्हाका  घोर कर्मांतु केशवा ॥१॥**

मगे आयक, अर्जुनान म्हळें। देवा तुवें जें वाक्य[1] उलयलें। तें लक्ष दिवन हांवें आयकलें। कमळापती।१।

**अर्जुनाचो दुभाव:** आत्मस्वरूप पळेतां। कर्तो, कर्म हीं उरना। अशें मत्त तुजें अनंता। निश्चीत जरी।२। तर म्हाका कशें श्रीहरी[2]। म्हणटा पार्था झूज करी। घुसपावंक म्हाका भीड धरनाशी। ह्या घोर कर्मांत।३। आगा पुराय कर्माचो निशेध करशी। तूंच कर्म करूं नाका म्हणशी। तर म्हाका कित्या करूं लायशी। हें हिंसक कर्म?।४। देवा, कर हाचोच विचार। तूं कर्माचो करता पुरस्कार। हें हिंसक कर्म भयंकर। करूं लायशी म्हाका?।५।

**ह्या दुभावी उतरांनी तूं घुस्पाविशी म्हजी मती । सांग एकूचु निश्चीतू  जें करीतु म्हजें बरें ॥२॥**

देवा, तुवेंच अशें उलोवंचें। तर आमी नेणाऱ्यांनी कितें करचें?। आतां सल्ले सगले म्हणचें। विचार विवेकाचे।६। आगा होच जर उपदेश म्हणशी। तर संभ्रम कित्या म्हणशी। आतां फिटली म्हजी हौस ही। आत्मबोधाची।७। वैजानूच पथ्य सांगचें। मगे आपणेंच वीख घालचें। तर पिडेस्तान कशें जियेवचें?। सांग म्हाका।८। आडवाटे कुड्ड्या लावचो। सोरो माकडा घालचो। तसो बेस बरो उपदेश मेळ्ळो। हो आमकां।९। हांव आदींच काय नेणा। तातुं ह्या भ्रमान मती चलना। म्हणून हो सारासार विचार कृष्णा। विचाल्ला तुका।१०। पळे तुजी एक एक नवलायी। तुजो बोध म्हाका गदळायी। तर तुज्या शरणागताठांयीं। कित्या करशी अशें?।११। आमी काया मन जिवान। पातेवंचें तुजेर विश्वासान। आनी करचें अशें तुवेन। तर सल्लेंच म्हणचें!।१२। आतां अशे परी बोध करशी। तर आमचें भलेंच करशी। हांगा ज्ञाना आस धरची कशी। म्हणी अर्जुन।१३। आतां ज्ञानाची हौस तर सल्ली। पूण आनिकूय एक गजाल जाली। ही मनाची थिराय गेली। गदळ्ळें तें।१४। तशेंच कृष्णा हें तुजें। चरित्र मातूय उमजना जें। वा मन पळेशी म्हजें। ह्या निमतीं।१५। वा तूं म्हाका फटयता। गूढ तत्त्वज्ञान सांगता। हाचें अनुमान करतां। निश्चीत कळना कांयच।१६। म्हणून देवा तुमी आयका। गुढार्थान उलोवं नाका। विवेक सांग म्हाका। सरळ सोंपो।१७। मंदमती गा म्हजी। त्या म्हाका सम कळटा अशी। सांग स्पश्ट तुजी। सांगणी।१८। पळे, जर पिडेरोगा निवारचें। वखद दिवचें गरजेचें। पूण मधूर तें आसचें। रुचिकूय तशें;।१९। तशें सम अर्थान भरिल्लें। तुवें फावशें तत्त्व सांगचेलें। जाणें बोध घेतलें। चित्त म्हजें।२०। देवा तुजेवरी मेळटां गुरू। इत्सातृप्ती कित्या न्ही धरूं?। हांगा कोणा भीड धरूं?। तूं माय आमची।२१। आगा दुबतें कामधेनुलें। सुदैवान जर मेळ्ळें। तर थंय कित्या आसचेलें। कामनेचें उणें?।२२। वा जर चिंतामणी हातीं येत। तर वान्शेचें कसलें संकश्ट?। जें आपणा सुखायत। तें कित्या इत्सुचें न्ही?।२३। अमृत[3] सिंधुदेगेरी वचचें। मगे तानेन व्याकूळ जावंचें। तर मगे कित्या कश्टुचें। वचूंक थंय?।२४।

तैसा जन्मांतरीं बहुतीं। उपासितां लक्ष्मीपती। तूं दैवें आजि हातीं। जाहलासी जरी।२५। तरी आपुलिया सवेसा । कां न मागावासि परेशा। देवा सुकाळु हा मानसा । पाहला असे ।२६। देखें सकळार्तींचें जियालें । आजि पुण्य यशासि आलें । हे मनोरथ जहाले । विजयी माझे ।२७। जी जी परममंगळधामा । देवदेवोत्तमा । तूं स्वाधीन आजि आम्हां । म्हणऊनियां ।२८। जैसें मातेचां ठायीं । अपत्या अनवसरु नाहीं । स्तन्यालागूनि पाहीं । जियापरी ।२९। तैसें देवा तूतें । पुसिजतसें आवडे तें ।आपुलेनि आर्तें । कृपानिधि।३०। तरी पारत्रिकीं हित । आणि आचरितां तरी उचित। तें सांगें एक निश्चित। पार्थु म्हणे।३१।

*श्रीभगवानुवाच:* **लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ। ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥३॥**

या बोला अच्युतु। म्हणतसे विस्मितु। अर्जुना हा ध्वनितु। अभिप्रावो।३२। जे बुद्धियोगु सांगतां। सांख्यमतसंस्था। प्रगटिली स्वभावता। प्रसंगें आम्हीं।३३। तो उद्देशु तूं नेणसीचि। म्हणोनि क्षोभलासि वायांचि। तरी आतां जाण म्यांचि। उक्त दोन्ही।३४। अवधारीं वीरश्रेष्ठा। ये लोकीं या दोन्ही निष्ठा। मजचिपासूनि प्रगटा। अनादिसिद्धा।३५। एकु ज्ञानयोगु म्हणिजे। जो सांख्यीं अनुष्ठिजे। जेथ ओळखीसवें पाविजे। तद्रूपता।३६। एक कर्मयोगु जाण। जेथ साधकजन निपुण। होऊनिया निर्वाण। पावती वेळे।३७। हे मार्गु तरी दोनी। परि एकवटती निदानीं। जैसी सिद्धसाध्यभोजनीं। तृप्ति एकी।३८। कां पूर्वापर सरिता। भिन्ना दिसती पाहतां। मग सिंधुमिळणीं ऐक्यता। पावती शेखीं।३९। तैसीं दोनीं ये मतें। सूचिती एका कारणातें। परी उपास्ति ते योग्यते-। आधीन असे।४०। देखें उत्प्लवनासरिसां। पक्षी फळासि झोंबे जैसा । सांगें नरु केवीं तैसा । पावे वेगां।४१। तो हळूहळू ढाळेंढाळें। केतुकेनि एकें वेळें। मार्गाचेनि बळें। निश्चित ठाकी।४२। तैसें देख पां विहंगममतें। अधिष्ठूनि ज्ञानातें। सांख्य सद्य मोक्षातें। आकळिती।४३। येर योगिये कर्माधारें। विहितेंचि निजाचारें। पूर्णता अवसरें। पावते होती।४४।

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते । न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥४॥**

वांचोनि कर्मारंभ उचित । न करितांचि सिद्धवत । कर्महीना निश्चित । होईजेना ।४५। कां प्राप्तकर्म सांडिजे। येतुलेनि नैष्कर्म्या होईजे। हें अर्जुना वायां बोलिजे। मूर्खपणें।४६। सांगें पैलतीरा जावें। ऐसें व्यसन कां जेथ पावे। तेथ नावेतें त्यजावें। घडे केवीं।४७। ना तरी तृप्ति इच्छिजे। तरी कैसेनि पाकु न कीजे। कीं सिद्धुही न सेविजे। केवीं सांगें।४८। जंव निरार्तता नाहीं। तंव व्यापारु असे पाहीं। मग संतुष्टीचां ठायीं। कुंठे सहजें।४९। म्हणोनि आइकें पार्था। जया नैष्कर्म्यपदीं आस्था। तया उचित कर्म सर्वथा। त्याज्य नोहे।५०। आणि आपुलालिया चाडे। आपादिलें हें मांडे। कीं त्यजिलें कर्म सांडे। ऐसें आहे।५१। हें वायांचि सैरा बोलिजे। उकलु तरी देखों पाहिजे। परी त्यजितां कर्म न त्यजे। निभ्रांत मानीं।५२।

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् । कार्यते ह्यवश: कर्म सर्व: प्रकृतिजैर्गुणै: ॥५॥**

जंव प्रकृतीचें अधिष्ठान। तंव सांडी मांडी हें अज्ञान। जे चेष्टा ते गुणाधीन। आपैसी असे।५३। देखें विहित कर्म जेतुलें। तें सगळें जरी वोसंडिलें। तरी स्वभाव काय निमाले। इंद्रियांचे।५४। सांगें श्रवणीं ऐकावें ठेलें। कीं नेत्रींचें तेज गेलें। हें नासारंध्र बुझालें। परिमळु नेघे।५५। ना तरी प्राणापानगति। कीं निर्विकल्प जाहली मति। कीं क्षुधातृषादि आर्ति। खुंटलिया।५६। हे स्वप्नावबोधु ठेले। कीं चरण चालों विसरले। हें असो काय निमाले। जन्ममृत्यू।५७। हें न ठकेचि जरी कांहीं। तरी सांडलें तें कायी। म्हणोनि कर्मत्यागु नाहीं। प्रकृतिमंतां।५८। कर्म पराधीनपणें। निपजतसे प्रकृतिगुणें। येरीं धरीं मोकलीं अंत:करणें। वाहिजे वायां।५९। देखें रथीं आरूढिजे। मग जरी निश्चळा बैसिजे । तरी चळा होऊन हिंडिजे। परतंत्रा।६०।

---

**अर्थ:** (४) परमकल्याणाची सुवात वा स्थान. (४) निश्काम कर्मयोगान मेळपी बुद्दीयोग. (५) मार्ग; वाटो. (६) मोक्षप्राप्ती. (७) विलंबान. (८) शास्त्रान सांगिल्लीं. (९) कर्ममुक्त. (१०) कर्मबंधनांतल्यान सुटप. (११) मायेचें. (१२) त्रिगुणांच्या. (१३) अट्टाहासान.

तसो जल्मोजन्मीं। पुजून तुका लक्ष्मीपती। तूं भाग्यान आयज हातीं। लागलो जरी;।२५। तरी हांवें स्वेच्छेन। कित्या मागूं नये तुजेकडेन। आयज उजवाडलो भाग्यान। सुदीन मनोरथ पुर्तीचो।२६। सकळ इत्सा सुफळ जावन। पूर्व-पुण्य फळा येवन। सगले मनोरथ पूर्ण-। सिद्धीक वतले।२७। आगा परम मंगलधामा[४]। सगल्यां देवां देव सर्वोत्तमा। तूं आयज अनुकूल आमकां। म्हणून।२८। जशें माये ठांय। बाळाक ना काळवेळ कांय। तें पियेतूच रावऽ। आंगार जेपरी;।२९। देवा तुका तशें। मनीं येता जें जशें। म्हाका जाय जशें। कुर्पेठेव्या।३०। तरी परलोकीं हिताचें। हांगा आचरुं उचीत अशें। तें एक सांग निश्चीतशें। म्हणी पार्थ।३१।

*भगवंतान म्हळें:* **वाटो त्यो दोन ह्या लोकां सांगल्यो आदींच निर्मळा। ज्ञानाचो योग सांख्यांचो योग्यांचो कर्म योग तो ॥३॥**

**दोनी मार्गांचें साध्य एक:** हें आयकून अच्युत। म्हणी जावन विस्मीत। अर्जुना हो संक्षिप्त। मथितार्थ म्हजो।३२। सांगतना बुद्दीयोग[४]। सांगलो सांख्यां ज्ञानयोग। आयलो सहज प्रसंग। सांगचो म्हणून।३३। नेणा तूं म्हजो हेतू। म्हूण कोपलो वोगीच तूं। हे मार्ग जगा दोनू। सांगले हांवेंच।३४। सम आयक वीरस्रेश्ठा। ह्या जगीं ह्यो दोन निश्ठा[५]। अनादि कालासावन पार्था। सांगल्यो हांवें।३५। म्हळा ज्ञानयोग एकाक। जो आचरतात सांख्य*। आत्मतत्वा जातां वळख। जाता तद्रूप।३६। दुसरो तो कर्मयोग जाण। जंय साधकजन निपूण। मेळयतात निर्वाण[६]। कालांतरान ।३७। हे मार्ग दिसूं वेगळे दोनी। तरी एक ते परिणामीं। जशी समसमान तृप्ती। शिद्यांत बी रांदिल्ल्या अन्नांत;।३८। वा पूर्व पश्चिमे व्हांवतल्यो। न्हंयो आसल्यो वेगळ्यो। पूण त्यो एकरूप जातल्यो। सागरीं अंतीं;।३९। तशें ह्या दोनी मार्गांतु। एकूच साध्य सुचीतु। पूण खंयची उपासना उचीतु। आसता साधकाचे* पात्रतायेर।४०। पळय एके झोंपयेनु। पक्षी फळा झोंबता उडुनु। तशी कशी जायत बेगीनु। फळप्राप्ती मनशाक?।४१। तो ल्हवुल्हवू, खांदे खांदयेन। चडटा पावता कळावान[७]। पूण त्या मार्गा आधारान। पावता निश्चीत।४२। तशें ज्ञानयोगा आचरण। सांख्य सदीं करून। मोक्ष जोडटात बेगीन। सवण्या* मार्गान ।४३। हेर योगी कर्ममार्गान। शास्त्रान सांगिल्ल्या आचारान। जोडटात योग्य काळान। पुण्याय मोक्षाची।४४।

**कर्मां करूंक लागलोना जायना कर्मा कर्ना असो। सर्व कर्मां जरी सोडलीं मेळऽ सिद्धी अशेंयु ना।४।**

**कर्मत्याग अशक्य:** सिद्धाभाशेन कोण मुळासावनु। उचीत[८] कर्मांय सोडूनु। सोदी जावंक कर्महीणु[९]। तें शक्य ना।४५। कर्तव्यकर्म सोडचें। म्हळ्यार निश्कर्म जावंचें। हें व्यर्थ, मूर्खपणाचें। उलोवणें अर्जुना।४६। मनशाक पलतडीं वचचें। हें जर गरजेचें। तर व्हड्या शिवाय कशें वचचें। सांग ताणें?।४७। वा तृप्ती इत्सितां। कशी मेळत ना रांदतां । वा रांदिल्लेंय ना जेवतां। सांग म्हाका?।४८। ना निरिच्छताय जंवर। कर्मांतल्यान सुटका ना तंवर। आपशीं थांबतात ते वेपार । मेळटां आत्मतुश्टी।४९। म्हणून आयक पार्था। जाका नैश्कर्म्यपदीं[१०] आस्था। उचीत कर्म केन्नाच ताका। येवंचें ना सोडूं।५०। आनी आपलेच इत्सेनु। म्हळें कर्म करिनु। वा तें सोडीनु। तें जायत कशें?।५१। हें व्यर्थ उलोवणें सगलें। विचार करतां कळटलें। पूर्ण कर्म जरी सोडलें। सुटना तें।५२।

**कर्माबगर कोणूच । खीणु लेगीतु राविना । प्रकृतीच्या गुणान सर्व। कर्म बंद्यांवरी करी ॥५॥**

जंवर प्रकृतीचें[११] आस्रयस्थान । कर्म सोडीन, करीन हें अज्ञान। कित्या कर्म हें गुणा[१२] आधीन। तें घडटा आपशीं।५३। कर्तव्य कर्म आसा जितलें। तें बळयां[१३] जरी सोडलें। तरी सभावधर्म कितें ना जातले। इंद्रियांचे?।५४। सांग, कान आयकुचे थांबलेय?। वा दोळ्यांचें तेज सल्लें?। वा नाक पर्मळ घेना जालें। ताच्यो पुडयो पुरोवनु ?।५५। वा प्राण अपाना गती गेली?। अथवा बुद्दी निर्विकल्प जाली?। वा भूक-ताने ना जातली॥ इत्सा केन्नाच?।५६। हें न्हिदप जागप थांबत?। वा पांय चलूंक विसरत?। आसूं हें; कितें सोंपत। जल्म मर्ण?।५७। हें चुकना कांयच जर। सोडलें तें कितें तर?। म्हूण ना कर्म त्यागप। देह धरिल्ल्या।५८। जें प्रकृतीगुणां आधीन। तें कर्म सामकेंच पराधीन। तें हांव धरीन वा सोडीन। व्यर्थ ही भावना।५९। जशें रथाचेर जो चडटा। मगे तातूंत निश्चळ बसता। तरी तो संचार करता। पराधीनपणान।६०।

कां उचलिलें वायुवशें। चळे शुष्क पत्र जैसें। निचेष्ट आकाशें। परिभ्रमे।६१। तैसें प्रकृतिआधारें। कर्मेंद्रियविकारें। निष्कर्म्युही व्यापारे। निरंतर।६२। म्हणऊनि संगु जंव प्रकृतीचा। तंव त्यागु न घडे कर्माचा। ऐसियाहि करूं म्हणती तयांचा। आग्रहोचि उरे।६३।

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारःस उच्यते ॥६॥**

जे उचित कर्म सांडिती। मग नैष्कर्म्य होऊं पाहती। परी कर्मेंद्रियप्रवृत्ती। निरोधुनी।६४। तयां कर्मत्यागु न घडे। जें कर्तव्य मनीं सांपडे। वरी नटती तें फुडें। दरिद्र जाण।६५। ऐसे ते पार्था। विषयासक्त सर्वथा। ओळखावे तत्त्वता। येथ भ्रांति नाहीं।६६। आतां देईं अवधान। प्रसंगें तुज सांगेन। या नैराश्याचें चिन्ह। धनुर्धरा।६७।

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन। कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥७॥**

जो अंतरीं दृढु । परमात्मरूपीं गूढु। बाह्य तरी रूढु। लौकिकु जैसा ।६८। तो इंद्रियां आज्ञा न करी। विषयांचें भय न धरी। प्राप्त कर्म न अव्हेरी। उचित जें जें।६९। तो कर्मेंद्रियें कर्मीं। राहटतां तरी न नियमी। परी तेथिंचेनि ऊर्मी । झांकोळेना।७०। तो कामनामात्रें न घेपे। मोहमळें न लिंपे। जैसें जळीं जळें न शिंपे। पद्मपत्र।७१। तैसा संसर्गामाजि असे। सकळांसारिखा दिसे। जैसें तोयसंगें आभासे। भानुबिंब ।७२। तैसा सामान्यत्वें पाहिजे। तरी साधारणुचि देखिजे। येरवीं निर्धारितां नेणिजे। सोय जयाची।७३। ऐसां चिन्हीं चिन्हितु। देखसी तोचि मुक्तु। आशापाशरहितु। वोळख पां।७४। अर्जुना तोचि योगी। विशेषिजे जो जगीं। म्हणोनि ऐसा होय यालागीं। म्हणिपे तूतें ।७५। तूं मानसा नियमु करीं। निश्चळु होय अंतरीं। मग कर्मेंद्रियें हीं व्यापारीं। वर्ततु सुखें।७६।

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः । शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥८॥**

म्हणशी नैष्कर्म्य होआवें । तरी एथ तें न संभवे । आणि निषिद्ध केवीं राहाटावें । विचारीं पां ।७७। म्हणोनि जें जें उचित। आणि अवसरेंकरूनि प्राप्त। तें कर्म हेतुरहित। आचर तूं।७८। पार्था आणीकही एक। नेणसी तूं हें कवतिक। जें ऐसें कर्म मोचक। आपैसें असे।७९। देखें अनुक्रमाधारें। स्वधर्मु जो आचरे। तो मोक्षु तेणें व्यापारें। निश्चित पावे।८०।

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः। तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥९॥**

स्वधर्मु जो बापा। तोचि नित्ययज्ञु जाण पां। म्हणोनि वर्ततां तेथ पापा। संचारु नाहीं।८१। हा निजधर्मु जैं खंडे। कुकर्मीं रति घडे। तैंचि बंधु पडे। संसारिकु।८२। म्हणोनि स्वधर्मानुष्ठान। तें अखंड यज्ञयाजन। जो करी तया बंधन। कंहींच नाहीं।८३। हा लोकु कर्में बांधिला। जो परतंत्रा भुतला। तो नित्य यज्ञातें चुकला। म्हणोनियां।८४। आतां येचिविशीं पार्था। तुज सांगेन एकी मी कथा। जैं सृष्ट्यादि संस्था। ब्रह्येनि केली।८५।

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः । अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥१०॥**

तैं नित्ययागसहितें। सृजिलीं भूतें समस्तें। परी नेणतीचि तियें यज्ञातें। सूक्ष्म म्हणउनी।८६। ते वेळीं प्रजीं विनविला ब्रह्मा। देवा आश्रयो काय एथ आम्हां। तंव म्हणे तो कमळजन्मा। भूतांप्रति।८७। तुम्हां वर्णविशेषवशें। आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे। यातें उपासा मग आपैसे। काम पुरती।८८। तुम्हीं व्रतें नियमु न करावे। शरीरातें न पीडावें। दुरी केंही न वचावें। तीर्थांसि गा।८९। योगादिकें साधनें। साकांक्ष आराधनें। मंत्रयंत्रविधानें । झणीं करा।९०। देवतांतरा न भजावें। हें सर्वथा कांहीं न करावें। तुम्हीं स्वधर्मयज्ञीं यजावें। अनायासें।९१। अहेतुकें चित्तें। अनुष्ठा पां ययातें। पतिव्रता पतीतें। जियापरी।९२।

---

**अर्थः** (१४) आचारधर्म. (१५) अखील मानव समाज. (१६) सुक्षीम. (१७) मानव जातीक.

---

वा वाऱ्यान हुबयल्लें। हालता पान जशें सुकिल्लें। उफेता, तें निश्चेश्ट जाल्लें। उडऽ आकाशीं;।६१। तशें देहा आधारान। कर्मेंद्रियांच्या विकारान। करता कर्म निरंतरपणान। निश्कर्म मनीस।६२। म्हणून जंवर मायेची सत्ता। तंवर कर्मत्याग घडना पार्था। अशें आसुनूय तो करूं म्हण्टा। ताचो दुराग्रह फकत उरता।६३।

**आंवळून कर्मेंद्रियां मूर्ख विशयु चिंतिता मनान्। अश्या मन्शा म्हळा ढोंगी चलणुकेनु लटीक तो॥६॥**

जे उचीत कर्मां सोडूनु। कर्मेंद्रियांचो निग्रह करूनु। जावंक इच्छितात कर्मविहीनु। अर्जुना।६४। तांकां कर्मां सोडिनातु। कर्मां घोळटा मनांतु। तांचें कर्मत्यागाचें नाटकु। दळडीर तांचें।६५। अशे पार्था जे आसतात। ते सामकेच विशयासक्त। वळखुचें निश्चीत। दुभावाविणे।६६। आतां दी ध्यान। प्रसंगानुसार तुका सांगन। निरिच्छ मनशाचें लक्षण। धनुर्धरा।६७।

**पूण करी मनानूच इंद्रियांचें नियंत्रणू। ओडीविणें करी कर्म योग्यतायेन तो व्हड ॥७॥**

**जीवनमुक्ताचें लक्षण:** निश्चळ जाचें मन। परमात्मरुपांत तल्लीन। मात्र तो भायल्यान। चार चौगांवरी।६८। तो इंद्रियांक आज्ञा कर्ना। विशयांचो भंय धर्ना। आयिल्लें कर्म अव्हेरना। उचीत जें जें।६९। कर्मेंद्रियांत वर्ततना। तो तांकां निरोधिना। विकारउर्मींचो लागना। लेप ताका।७०। वान्सा ताका आफडिना। मोहा म्हेळ लागना। जळीं आसुनूय भिजना। साळका पाना वरी।७१। तसो तो संवसारी आसता। हेरां भाशेनूच दिसता। जशें उदका संगतीं भासता। सूर्यबिंब।७२। तसो वयलेवयर पळेतां। तो सरसमान दिसता। म्हूण कळना भारता। ताची पात्रताय।७३। अश्या लक्षणांनी भरीत। जाण तोच मुक्त। आशेपासा विरयत। वळख तूं।७४। अर्जुना तोच योगी। तोखेवंचो जगीं। म्हूण तूंय जा योगी। हाचेवरी।७५। तूं मना नियमन करी। जा निश्चळ अंतरीं। मगे कर्मेंद्रियां आपल्या वेपारीं। वावरुंदी खुशाल।७६।

**नेमिल्लें कर तूं कर्म सोडचें परस तें बरें। कुडी निर्वाहु जावंचोना कर्माविणें बरे तरेन् ॥८॥**

**स्वधर्मचरणान मोक्षप्राप्ती:** म्हूण जावंचें कर्माविरयत। हें संभवना संवसारांत। मगे कित्या चलचें शास्त्रा आड। हाचो कर विचार।७७। म्हणून जें जें कर्म उचीत। जाता प्रसंगानुसार प्राप्त। तें तें कर्म हेतू विरयत। आचरचें तुवें।७८। घे लक्षांत आनिकय एक। तूं नेणा कितें तें निश्काम कर्म। तें सोडय संवसारांतल्यान। आपशींच।७९। आपल्या अधिकाराप्रमाण। करी स्वधर्मा आचरण। निश्चीत ताका लागून। तो पावऽ मोक्षा।८०।

**यज्ञार्थ करिना कर्म लोकां पासांतु घालि तें। कर यज्ञार्थ तूं कर्म ओडी विणें बरे तरेन् ॥९॥**

**स्वधर्मपालन होच यज्ञ:** बाबा, स्वधर्म जो आचरुंचो। तोच नित्ययज्ञ समजुंचो। असो वर्तता जो, नासता पापाचो। रिगाव थंय।८१। हो निजीधर्म जो सोडी। ताका कुकर्मांत लागऽ गोडी। तेन्नाच संवसारबंधनीं। पडऽ तो।८२। म्हणून, स्वधर्म अनुश्टानु। तेंच अखंड यज्ञयाजनु। ते करतल्या ना बंधनु। दुभावावीण।८३। नित्ययज्ञ करूंक चुकले। म्हणून कर्मांत ते बांदले। आनी मायापासांत घुसपले। लोक हे सगले।८४। आतां हेच विशीं पार्था। तुका सांगन हांव एक कथा। जंव सृश्टी आदी वेवस्ता। ब्रह्म्यान केली।८५।

**यज्ञासवें प्रजा निर्मून् म्हळें आदीं प्रजापतीन्। तुमी वाडात यज्ञानु तुमकां जावं कामधेनु हो॥१०॥**

**ब्रह्मदेवाचो उपदेश:** तंव नित्ययज्ञासयत[१४]। निर्मिले प्राणीमात्र[१५] समस्त। तांकां नासली नात। गहन[१६] यज्ञ कर्माची।८६। तावळी प्रजेन विनयलें ब्रह्म्या। कितें आधार हांगा आमकां। तंव तो कमळांत जल्मल्लो म्हणटा। प्रजेक[१७]।८७। तुमकां वर्णभेदाप्रमाण। हांवें दिलो हो स्वधर्मूच नेमून। तो आचरशी, जायत आपशीं पूर्ण। इत्सा तुमच्यो।८८। तुमी करचीं न्हय व्रतां नेम। पिडचें न्ही कुडीक तपान। वचचें न्हय खंयच पयस। तीर्थांक।८९। करनाका योग साधना। इत्सेपुर्तीक आराधना। मंत्रयंत्रादी अनुश्टानां। नाकाच तीं;।९०। देव देवतांची भक्ती। नाका हाडूं चित्तीं। साधनां स्वधर्माची। करा विनासायास।९१। स्वधर्म आचरचो। मनीं हेतू न्ही धरचो। पतिव्रतेन करचो। पतीधर्म जसो;।९२।

तैसा स्वधर्मरूप मखु । हाचि सेव्यु तुम्हां एकु। ऐसें सत्यलोकनायकु। म्हणता जहाला।९३। देखा स्वधर्मातें भजाल। तरी कामधेनु हा होईल। मग प्रजा हो न संडील। तुमतें सदा।९४।

**देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु व:। परस्परं भावयन्त: श्रेय: परमवाप्स्यथ ॥११॥**

जें येणेंकरूनि समस्तां। परितोषु होईल देवतां। मग ते तुम्हां ईप्सितां। अर्थातें देती।९५। या स्वधर्मपूजा पूजितां। देवतागणां समस्तां। योगक्षेमु निश्चिता। करिती तुमचा।९६। तुम्ही देवतांतें भजाल। देव तुम्हां तुष्टतील। ऐसी परस्परें घडेल। प्रीति जेथ।९७। तेथ तुम्ही जें करूं म्हणाल। तें आपैसें सिद्धी जाईल। वांछितही पुरेल। मानसींचें।९८। वाचासिद्धी पावाल। आज्ञापक होआल। म्हणियें तुमतें मागतील। महाऋद्धि।९९। जैसें ऋतुपतीचें द्वार। वनश्री निरंतर। वोळगे फळभार। लावण्येंसी।१००।

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविता: । तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव स: ॥१२॥**

तैसें सर्व सुखेंसहित। दैवचि मूर्तिमंत। येईल देखा काढत। तुम्हांपाठीं।१। ऐसे समस्त भोगभरित। होआल तुम्ही अनार्त। जरी स्वधर्मैकनिरत। वर्ताल बापा।२। कां जालिया सकल संपदा। जो अनुसरेल इंद्रियमदा। लुब्ध होऊनियां स्वादा। विषयांचिया।३। तिहीं यज्ञभाविकीं सुरीं। जे हे संपत्ति दिधली पुरी। तयां स्वमार्गीं सर्वेश्वरीं। न भजेल जो।४। अग्निमुखीं हवन। न करील देवतापूजन। प्राप्त वेळे भोजन। ब्राह्मणाचें।५। विमुखु होईल गुरुभक्ती। आदरु न करील अतिथी। संतोषु नेदील ज्ञाती। आपुलिये।६। ऐसा स्वधर्मुक्रियारहितु। आथिलेपणें प्रमत्तु। केवळ भोगासक्तु। होईल जो।७। तया मग अपावो थोरु आहे। जेणें तें हातींचें सकळ जाये। देखा प्रपातही न लाहे। भोग भोगूं॥८। जैसें गतायुषी शरीरीं। चैतन्य वासु न करी। कां निदैवाचां घरीं। न राहे लक्ष्मी।९। तैसा स्वधर्मु जरी लोपला। तरी सर्व सुखांचा थारा मोडला। जैसा दीपासवें हरपला। प्रकाशु जाय।११०। तैसी निजवृत्ति जेथ सांडे। तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे। आइका प्रजा हो हें फुडें। विरंचि म्हणे।११। म्हणौनि स्वधर्मु जो सांडीाय तयातें काळु दंडील। चोरु म्हणौनि हरील। सर्वस्व तयाचें।१२। मग सकळ दोष भंवते। गिंवसोनि घेती तयातें। रात्रिसमयीं स्मशानातें। भूतें जैशीं।१३। तैशीं त्रिभुवनींचीं दु:खें। आणि नानाविधें पातकें। दैन्यजात तितुकें। तेथेंचि वसे।१४। ऐसें होय तया उन्मत्ता। मग न सुटे बापा रुदतां। परी कल्पांतींहीं सर्वथा। प्राणिगण हो।१५। म्हणौनि निजवृत्ति हे न संडावी। इंद्रियें बरळों नेदावीं। ऐसें प्रजांतें शिकवी। चतुराननु।१६। जैसें जळचरां जळ सांडे। आणि तत्क्षणीं मरण मांडे। हा स्वधर्मु तेणें पाडें। विसंबों नये।१७। म्हणौनि तुम्हीं समस्तीं। आपुलालिया कर्मीं उचितीं। निरत व्हावें पुढतपुढती। म्हणिपत असें।१८।

**यज्ञशिष्टाशिन:सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषै: । भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥१३॥**

देखा विहित क्रियाविधी। निर्हेतुका बुद्धी। जो असतिये समृद्धी। विनियोगु करी।१९। गुरु गोत्र अग्नि पूजी। अवसरीं भजे द्विजीं। निमित्तादिकीं यजी। पितरोद्देशें।१२०। या यज्ञक्रिया उचिता। यज्ञेंशीं हवन करितां। हुतशेष स्वभावत:। उरे जें जें।२१। तें सुखें आपुलां घरीं। कुटुंबेंसीं भोजन करी। कीं भोग्यचि तें निवारी। कल्मषातें।२२। तें यज्ञावशिष्ट भोगी। म्हणोनि सांडिजे तो अघीं। जयापरी महारोगीं। अमृतसिद्धी।२३। कीं तत्त्वनिष्ठु जैसा। नागवे भ्रांतिलेशा। तो शेषभोगी तैसा। नाकळे दोषा।२४। म्हणोनि स्वधर्मे जें अर्जे। तें स्वधर्मे चि विनियोगिजे। मग उरे तें भोगिजे। संतोषेंसीं।२५। हें वांचूनि पार्था। राहाटों नये अन्यथा। ऐसी आद्य हे कथा। मुरारी सांगे।२६। जे देहचि आपणपें मानिती। आणि विषयांतें भोग्य म्हणती। यापरतें न स्मरती आणिक कांहीं।२७। हे यज्ञोपकरण सकळ। नेणतसांते बरळ। अहंबुद्धी केवळ। भोगूं पाहती॥२८। इंद्रियरुचीसारखे। करविती पाक निके। ते पापिये पातकें। सेविती जाण।२९।

---

**अर्थ:** (१८) ब्रह्मदेव. (१९) कामधेनूवरी इत्सा पूर्ण करपी. (२०) मागिल्लें दितल्यो आनी दिल्लें राखतल्यो. (२१) उलयल्लें खरें जाता तें सामर्थ्य. (२२) वसंत रुतू. (२३) श्रीकृष्ण.

